महागाणपत्य श्रीगृत्समदमुनींनी राजा प्रल्हादास पुढील मदासुर कथानक वर्णिण्यास आरंभ केला. आनंदोत्सवाचा जोर थोडा ओसरला. काही काळ गेला. दैत्यवीरांच्या आगामी योजनांबाबतच्या सभा सुरू झाल्या. सत्ता मिळवण्यापेक्षा ती टिकविणे अधिक दुष्कर असते. अतः मिळालेले त्रैलोक्य साम्राज्य कायम टिकावे



यासाठी एके दिवशी त्रिपुरासुर विनम्रपणे मदासुरास म्हणू लागला- प्रभू! माझे वचन ऐका. जे दैत्यांना परमहितकारी, सुखद तथा अखंड आनंददायी आहे. दैत्यांनी आपल्या बाहुबलाने यापूर्वीही अनेकदा त्रैलोक्यावर विजय मिळवला आहे. देवतांना अशीच गिरिकंदरात निवास करण्याची वेळ पूर्वीही आली आहेच. मात्र त्या तेथे शांत बसत नाहीत. तेथे दैत्यसाम्राज्य विनाशाच्या योजना राबविल्या जातात. हिरण्यकश्यपूने देवता अशाच वनी धाडल्या असतांना त्यांनी अचानक नरसिंहाला तयार करून दैत्यसाम्राज्य उधळवले. अन्य दैत्यराजांच्याही वाट्याला याच इतिहासाची पुनरावृत्ती आलेली आहे.

आता आपण ब्रह्मांडाधिपती झाला आहात. मात्र त्या देवीदेवतांना असे मुक्त सोडून आपण चिंतारहित राज्य कसे करू शकाल? देवता आपल्या नित्य तथा स्वभावत: वैरी असल्याचे वेद वर्णितो. ते कधीही आमचे मित्र होऊ शकणार नाहीत. तेव्हा हे नृपसत्तमा! आपण त्या देवतांच्या कायमस्वरूपी विनाशासाठी उद्युक्त व्हायला हवे. अन्यथा भविष्यांत आपल्यावरही हीच वेळ येऊ शकते.

शस्त्रास्त्रांनी या देवतांना कितीही मारले तरी त्या मरत नाहीत. त्यामुळेच देवांना 'अमर' असे म्हणतात. वेदादिकात त्यांच्या या स्वरूपाची महती गाईली आहे. त्यांचे मरण त्याचवेळी ओढवेल ज्यावेळी जगातून कर्माचा उच्छेद होईल. कर्म-अन्नावर देवतांचे जीवन अवलंबून असते. त्यामुळे सर्वप्रथम यज्ञ याग इ. करणाऱ्या ब्राह्मणांचा विनाश करायला हवा. आणि यज्ञादिक विध्वंसाची आसुरी कर्मे जे करतील त्यांचा गौरव करायला हवा. त्याचप्रमाणे ही समस्त कर्मे वर्ण तथा आश्रम व्यवस्थेवर आधारीत आहेत. विप्रवर्ण नष्ट केला की आपोआपच ही रचनाही नष्ट होईल. तेव्हा हे दैत्येंद्रा! आपण आम्हास कर्मविनाशाची आज्ञा करावी. सर्वत्र आसुरी वृत्तीच्याच फैलावाचा आदेश द्यावा.

अशा रीतीने देव, धर्म, ब्राह्मण, शास्त्रविरोध हाच ज्याचा स्वभाव आहे, यातच ज्याला आसक्ती आहे, यासाठीच ज्याची धडपड आहे तो राक्षसांमधील महावीर त्रिपुरासुर शांत राहिला. मदासुर काय म्हणतो याची उत्सुकतापूर्वक वाट पाहू लागला.

हाती आलेली अनिर्बंध सत्ता आणि अशा धर्मद्वेषी, देवविनाशी वृत्तीची संगत. मदासुराच्या अध:पताला मग रोखणार कोण? त्याची आसुरीवृत्ती जागी झाली तो म्हणू लागला- 'हे राक्षसवीरा! तुझा सल्ला अत्यंत सुयोग्य आहे. हे बुद्धिवंता, तुझ्या मनात आले आहे तसेच आता तुम्ही करावे.'

आधीच विकृती त्यात राजाश्रय, मग काय विचारता! भयावह अत्याचारांच्या शृंखलेला आरंभ झाला. त्रिपुरासुराच्या नेतृत्वात राक्षसी सेनेने देवराज्य नष्ट करण्याची, देवतांना संपविण्याची नवनवीन योजना हाती घेतली. त्यानुसार कृती आरंभिली. संपूर्ण ब्रह्मांडात जेथे जेथे यज्ञ, याग, होम, हवन, तर्पण, ध्यानादिक पुण्यकर्मे सुरू होती. तेथे जाऊन

देवता पीडण, कर्मनाश इ. सर्व सांगत सज्जनांचा वाली उरला नसल्याचे सांगितले. आता आपण साक्षात् परब्रह्मरूपातच अवतरला आहात. आपणास सर्व समान असले तरी आपल्या मर्यादांचे उल्लंघन दैत्यांनी केले असल्याने त्यांच्या विलयाचा मार्ग आपण सांगावा अशी दीनपणे याचना केली. जगाला सुखी करण्यासाठी आपण त्यांच्या वधाचा मार्ग दाखवावा अशी प्रार्थना केली.

या जगतात महामुनी सत्कर्मांची पाठराखण करतात. तथा विकृत कर्मांचा उच्छेद करतात. दुष्ट विनाशाला हिंसा म्हणत नाही. ती महायोगींना समर्पकच असते. विकृतींचा विनाश हे सत्कर्मच आहे. ती हिंसा नसते, असेच साधू सांगतात. अतः कृपया आम्हास मदासुर वधाचा तथा धर्मस्थापनेचा उपाय सांगावा, अशी प्रार्थना करण्यात आली.



